कोविड-१९ च्या तपासणीसाठी जिल्हा स्त्री रुग्णालय, वाशिम येथे RT-PCR प्रयोगशाळा स्थापन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः करोना-२०२०/प्र.क्र.१७९/आरोग्य ३अ

गो.ते.रुग्णालय आवार, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : २६ ऑगस्ट , २०२०

**वाचा :- अध्यक्ष, जिल्हा खरेदी समिती तथा जिल्हाधिकारी, सदस्य, जिल्हास्तर खरेदी समिती तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, सदस्य-सचिव, जिल्हास्तर खरेदी समिती तथा जिल्हा शल्य चिकित्सक, सदस्य-सचिव, जिल्हास्तर खरेदी समिती तथा जिल्हा आरोग्य अधिकारी यांचे पत्र क्रमांक. सारुवा/Covid-१९/६९२०/२०२०, दिनांक ०४.०८.२०२०**

**प्रस्तावना :-**

वाशिम जिल्हात एकही शासकीय महाविद्यालय नसून जिल्हात कोविड-१९ निदान करण्यासाठी कोणतीही शासकीय किंवा खाजगी प्रयोगशाळा उपलब्ध नाही. त्यामुळे सद्य:स्थितीत कोविड-१९ चे नमुने तपासणीकरीता अकोला (८० कि.मी.) , यवतमाळ (१४७ कि.मी.) , अमरावती(१३० कि.मी.) व नागपूर (२८५ कि.मी.) या ठिकाणी पाठवावे लागत असल्याने तपासणी अहवाल प्राप्त होण्यास विलंब होत आहे. या पार्श्वभूमीवर जिल्ह्यात सर्व सुविधा युक्त RT-PCR प्रयोगशाळा असणे आवश्यक असल्याने, आवश्यक उपकरणे, यंत्रसामुग्री व इतर साधनसामुग्री खरेदी करून जिल्ह्यातच प्रयोगशाळा स्थापन करण्यासाठी, जिल्हास्तर खरेदी समितीने प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

कोविड-१९ विषाणु आजाराचे रोग निदान करण्याची सुविधा RT-PCR प्रयोगशाळा, जिल्हा स्त्री रुग्णालय, वाशिम येथे कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक असलेली पदे भरण्यास, RT-PCR प्रयोगशाळेकरीता आयसीएमआर संस्थेने ठरवून दिलेल्या आवश्यक उपकरणांची खरेदी जिल्हास्तरावरून कोविड-१९ उपाययोजना करणेकरीता उपलब्ध निधी अंतर्गत करण्यास आणि उपकरणे, यंत्रसामुग्री, फर्निचर, कझ्युमेबल व इतर आवश्यक साहित्य साधनसामुग्री, खरेदी करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे-

१. साहित्य सामुग्री :- कोविड-१९ RT-PCR प्रयोगशाळेकरीता आयसीएमआर संस्थेने ठरवून दिलेले आवश्यक उपकरणे ही मे. हाफकीन बायो. फार्मा, मुंबई यांचे स्तरावरून झालेल्या दर करारानुसार करण्यास तसेच, RT-PCR प्रयोगशाळा कार्यान्वित करणेकरीता अंदाजित रू.२०० लक्ष खर्च अपेक्षित असून, सदरहु खरेदी जिल्हास्तरावरून कोविड-१९ उपाययोजना करणेकरीता उपलब्ध निधी अंतर्गत करण्यास मान्यता देण्यात आहे.

२. मनुष्यबळ :- कोविड-१९ आजाराचे निदान करणेकरीता RT-PCR प्रयोगशाळेच्या कामकाजाकरीता आवश्यक तांत्रिक व इतर सहाय्य करणारी पदे भरणेकरीता खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(१) मायक्रोबायोलॉजीस्ट/पॅथॉलॉजीस्ट - ( २ पदे)

(२) प्रयोगशाळा तंत्रज्ञ - (६ पदे)

(३)प्रयोगशाळा सहाय्यक - ( ३ पदे)

(४)डाटा एन्ट्री ऑपरेटर - ( २ पदे)

(५)अटेंडन्ट - ( ४ पदे)

(६)सफाई कामगार - ( २ पदे)

या पदांच्या वेतनाचा खर्च सन २०२०-२१ या वर्षाचे मंजूर कृती आराखड्यातून करावा.

३. प्रयोगशाळा उपकरणे व साहित्य यांचे खरेदीकरीता आवश्यक खर्च जिल्हा नियोजन समिती, वाशिम येथील मंजूर निधीतून करण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०८१४५२०४६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.08.28 14:00:03 +05'30'

**( रो.दि.कदम-पाटील)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक (१), आरोग्य सेवा, मुंबई.
४. संचालक (२), आरोग्य सेवा, पुणे
५. जिल्हाधिकारी, वाशिम
६. जिल्हा शल्य चिकित्सक, वाशिम
७. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम
८. निवडनस्ती (आरोग्य-३ अ ).